**श्री. श्रीकांत नामदेव मैंदाळे, वस्त्रनिर्माण तज्ञ वर्ग-१, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांची स्वेच्छा सेवानिवृत्ती मंजूर करुन त्यांना शासन सेवेतून कार्यमुक्त करणेबाबत**

**महाराष्ट्रशासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन आदेश क्रमांकः आस्था-२०१८/ प्र. क्र. १६२/ टेक्स-२**
१६ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २८ जून, २०१८

<u>वाचा:-</u> १) श्री. श्रीकांत नामदेव मैंदाळे, वस्त्रनिर्माण तज्ञ वर्ग-१ यांचा दिनांक २९ मे, २०१८ चा अर्ज
२) संचालक (वस्त्रोद्योग) यांचे पत्र क्र. कार्या.१/ आस्था/श्री. मैंदाळे/३२५६/१८, दिनांक ३० मे, २०१८
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक सेनिवे १००१/१३०/ सेवा-४, दिनांक २ जून, २००३
४) शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांक सेनिवे २०१५/प्र.क्र. ७५/सेवा-४, दिनांक १२ एप्रिल, २०१६.

<u>प्रस्तावना:-</u>

श्री. श्रीकांत नामदेव मैंदाळे, वस्त्रनिर्माण तज्ञ वर्ग-१, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांनी संदर्भ क्र. १ येथील दिनांक २९ मे, २०१८ च्या अर्जान्वये कौटुंबिक कारणास्तव शासकीय सेवेतून स्वेच्छा सेवानिवृत्तीची पूर्वसूचना दिलेली आहे.

२. संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र शासन, नागपूर यांनी संदर्भ क्र. २ येथील दिनांक ३० मे, २०१८ च्या पत्रान्वये श्री. श्रीकांत नामदेव मैंदाळे, वस्त्रनिर्माण तज्ञ वर्ग-१ यांचा स्वेच्छासेवानिवृत्तीचा अर्ज शासन मान्यतेस्तव सादर केलेला आहे.

३. सबब, श्री. श्रीकांत नामदेव मैंदाळे, वस्त्रनिर्माण तज्ञ वर्ग-१ यांची स्वेच्छा सेवानिवृत्ती स्वीकारुन त्यांना शासन सेवेतून कार्यमुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत:

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ६६ (४) (अ) नुसार तसेच वित्त विभागाचा दिनांक २ जून, २००३ चा शासन निर्णय व दिनांक १२ एप्रिल, २०१६ च्या शासन अधिसूचनेतील सुधारणेनुसार श्री. श्रीकांत नामदेव मैंदाळे, वस्त्रनिर्माण तज्ञ वर्ग-१, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांची स्वेच्छा सेवानिवृत्तीची सूचना स्वीकारुन त्यांना दिनांक २९ जून, २०१८ (म. पु.) पासून शासन सेवेतून कार्यमुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री. श्रीकांत नामदेव मैंदाळे, वस्त्रनिर्माण तज्ञ वर्ग-१ यांचेविरुद्ध विभागीय चौकशी प्रलंबित नसून त्यांचेकडून कोणतेही शासकीय येणे बाकी नसल्याचे संचालक (वस्त्रोद्योग) यांनी प्रमाणित केले आहे.

३. श्री. श्रीकांत नामदेव मैंदाळे, वस्त्रनिर्माण तज्ञ वर्ग-१ यांच्या स्वेच्छा सेवानिवृत्तीनंतर वेतन पडताळणी पथकाकडून त्यांच्या वेतननिश्चितीची पडताळणी केल्यानंतर वेतन व भत्त्यांचे अतिप्रदान झाल्याचे निदर्शनास आल्यास, त्या सर्व रकमांची वसुली महाराष्ट्र नागरी सेवा (निवृतीतवेतन) नियम, १९८२ मधील नियम १३२(२) नुसार श्री. श्रीकांत नामदेव मैंदाळे यांच्या सेवानिवृत्ती उपदानाच्या रकमेतून समायोजित करण्याची व आवश्यक ते कार्यकारी आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र शासन, नागपूर यांनी करावी.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२८१२४२२२९४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gauri Rahul Mhaske

Digitally signed by Gauri Rahul Mhaske
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e3b06f24c3c5bb026c414c42f865f39144c21fb0f8c3a69c8e6e8dc2c5bb9ddd, serialNumber=b018ba858dd6b20cc7a84f6bc86a86d6a6e9ac3ac56c5dbfcd89f36c74de3e1f, cn=Gauri Rahul Mhaske
Date: 2018.06.28 12:47:37 +05'30'

**(गौरी रा. म्हस्के)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर
३. संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.
४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
६. श्री. श्रीकांत नामदेव मैंदाळे, वस्त्रनिर्माण तज्ञ वर्ग-१ यांना
(संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र शासन, नागपूर यांचेमार्फत)
७. निवडनस्ती (टेक्स-२)